**नियोजन विभागामार्फत तीर्थक्षेत्र विकास व पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी राबविण्यात येत असलेल्या विकास आराखडे यामधील मंजूर कामे पूर्ण होण्याकरीता दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.१२ /का.१४४४-अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १६ जून, २०२३

वाचा :-

१. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः सेविआ-२००९/प्र.क्र.८०/का.१४४४ दि.०८.०३.२०१०
२. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१०/प्रक्र१२३/का.१४४४, दि.०३.०३.२०११
३. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.७७/का.१४४४ दि.२२.१०.२०१२
४. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४ दि. ०३.१२.२०१२
५. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१०/प्र.क्र.१०९/का.१४४४, दि.१२.०९.२०१४
६. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः सेविआ-२०१३/प्र.क्र.१७/का.१४४४ दि.०१.१०.२०१६
७. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.०५/का.१४४४, दि.२८.०२.२०१८
८. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.६३/का.१४४४, दि.०९.०८.२०१८
९. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.२०/का.१४४४, दि.२६.०२.२०१९
१०.नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक :तीक्षेवी-२०२२/प्र.क्र.८/का.१४४४, दि.२१.०३.२०२२.

प्रस्तावना:-

नियोजन विभागाचे उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक १ ते १० येथील शासन निर्णयान्वये तीर्थक्षेत्र विकास तसेच पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी विकास आराखडे राबविण्यात येत आहेत. या विकास आराखडे अंतर्गत मंजूर करण्यात आलेली सर्व कामे पूर्ण करण्याकरीता संबंधित विकास आराखड्यांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. **शासन निर्णय :-**

नियोजन विभागामार्फत तीर्थक्षेत्र विकास व पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी राबविण्यात येत असलेल्या खालील विकास आराखडे अंतर्गत मंजूर करण्यात आलेली सर्व कामे पूर्ण करण्याकरीता **दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत** मुदतवाढ देण्यात येत आहेः

२.१ "देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, पालखीतळ, नेवासा क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा".

२.२. "सेवाग्राम, जिल्हा वर्धा परिसरात पायाभूत सुविधा उपलब्ध करण्यासाठी सेवाग्राम विकास आराखडा".

२.३ "श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगाव तीर्थक्षेत्रासाठी मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा" .

२.४ "राष्ट्रसंत तुकडोजी महाराज जन्मशताब्दी महोत्सवानिमित्त मोझरी क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा".

२.५ "वलगांव, तालुका व जिल्हा अमरावती येथे संत गाडगेबाबांचे समाधी स्थळ विकसित करून मूलभूत सुविधा उपलब्ध करण्यासाठी विकास आराखडा".

२.६ "श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, तालुका तिवसा, जिल्हा अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी विकास आराखडा".

२.७ "श्रीक्षेत्र घृष्णेश्वर, वेरुळ, तालुका खुलताबाद, जिल्हा औरंगाबाद विकास आराखडा".

२.८ "श्रीक्षेत्र भिमाशंकर तीर्थक्षेत्र, तालुका खेड सह तालुका आंबेगाव, जिल्हा पुणे विकास आराखडा".

२.९ "श्रीक्षेत्र गणपतीपुळे, तालुका व जिल्हा रत्नागिरी तिर्थक्षेत्र विकास आराखडा"

**३.** नियोजन विभागामार्फत तीर्थक्षेत्र विकास व पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी राबविण्यात येत असलेल्या विकास आराखडे अंतर्गत मंजूर करण्यात आलेली सर्व कामे दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत पूर्ण करण्याची जबाबदारी आराखड्याचे संबंधित "संनियंत्रण अधिकारी" यांची राहील.

**४.** महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०६१९१५४५५२२३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MANISHA ANIL RANE
Date: 2023.06.19 15:46:50 +05'30'

**( मनिषा राणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
२) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
४) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण
६) जिल्हाधिकारी, अमरावती / वर्धा / औरंगाबाद / पुणे / सातारा / अहमदनगर / सोलापूर/रत्नागिरी

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई

३. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
४. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
५. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव ( सर्व ), मंत्रालय, मुंबई
८. मा. संसद सदस्य /विधानसभा/ विधान परिषद सदस्य, (सर्व)
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
१०.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (सर्व)
११.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य-१,मुंबई,
१२.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
१३. सह सचिव (कार्यासन-१४४४-अ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. विशेष कार्य अधिकारी (तीर्थक्षेत्र विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती
१५.विशेष कार्य अधिकारी (तीर्थक्षेत्र विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे
१६.जिल्हा नियोजन अधिकारी, वर्धा / औरंगाबाद / पुणे / सातारा / अहमदनगर / सोलापूर
१७. निवड नस्ती, का-१४४४- अ, नियोजन विभाग, मुंबई.